प्रादेशिक उप आयुक्त मत्स्यव्यवसाय या पदावर पदोन्नतीने पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

**शासन आदेश क्रमांकः मत्स्यआ-२०१८/(९६/२०१८)/पदुम-१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**तारीख: २१ जून, २०१८.**

**शासन आदेश :-**

मत्स्यव्यवसाय विभागातील पुढील सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय (गट-अ) (तांत्रिक) यांना प्रादेशिक उप आयुक्त मत्स्यव्यवसाय या पदावर रुपये १५६००-३९१०० (ग्रेड पे ६६००) या वेतनश्रेणीत खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर **तात्पुरत्या / तदर्थ** स्वरुपात महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

१. श्री.युवराज आकाराम चौगले (अ.जा.) (ज्ये.क्र.४)
२. श्री.महेश हिंमतराव देवरे (इ.मा.व.) (ज्ये.क्र.५)
३. श्री.अभय भीमराव देशपांडे (खुला) (ज्ये.क्र.६)
४. श्रीमती ह्रता अशोक दिक्षित (खुला) (ज्ये.क्र.८)
५. श्री.विजय बाळकृष्ण शिखरे (अ.जा.) (ज्ये.क्र.९)

२. वर नमूद अधिकाऱ्यांना खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे :-

१) सदर पदोन्नती ही मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ वरील मा.सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

२) सदर पदोन्नती ही महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथील मूळ अर्ज क्र.१८७/२०१० व २४२/२०१० मध्ये दिलेल्या निर्णयाच्या विरोधात महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेल्या रिट पिटीशन क्र.६२५/२०११ तसेच, श्री.चं.पा.वाटेगांवकर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.६२६/२०१७ मध्ये अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

३) वरील अधिकाऱ्यांची पदोन्नती ही सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय (गट-अ) (तांत्रिक) संवर्गाच्या अंतिम ज्येष्ठतेच्या व त्यामध्ये होणाऱ्या बदलांच्या अधीन राहील व या पदोन्नतीमुळे वरील अधिकाऱ्यांना सदर पदोन्नतीच्या दिनांकापासून ज्येष्ठतेचा हक्क मागता येणार नाही.

४) त्यांना देण्यात आलेली ही पदोन्नती कोणतीही पूर्वसूचना वा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

३. पदोन्नत झालेल्या वरील अधिकाऱ्यांची पदोन्नतीने नियुक्ती सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने खालीलप्रमाणे करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव (सर्वश्री.) | सध्या धारण करीत असलेले पद | वाटप झालेला महसूली विभागीय संवर्ग | पदोन्नतीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ४ | ३ | ५ | ६ |
| १. | युवराज आकाराम चौगले | सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय (तांत्रिक), जि.मुंबई उपनगर. | कोकण-२ | उप आयुक्त, मत्स्यव्यवसाय (अर्थ व नियोजन), आयुक्त मत्स्यव्यवसाय कार्यालय, मुंबई. | रिक्त पदी. |
| २. | महेश हिंमतराव देवरे | खाजगी सचिव, मा.मंत्री आदिवासी विकास यांचे कार्यालय. | नाशिक | खाजगी सचिव, मा.मंत्री, आदिवासी विकास यांच्या कार्यालयात प्रपत्र बढतीने पदस्थापना. | |
| ३. | अभय भीमराव देशपांडे | सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय, औरंगाबाद | पुणे | प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, पुणे. | रिक्त पदी. |
| ४. | श्रीमती ह्रता अशोक दिक्षित | सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय (तांत्रिक), अमरावती. | औरंगाबाद | प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, औरंगाबाद. | रिक्त पदी. |
| ५. | विजय बाळकृष्ण शिखरे | सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय (तांत्रिक), पुणे. | अमरावती | प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, अमरावती. | रिक्त पदी. |

४. सदर अधिकाऱ्यांना महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूल विभाग वाटप नियम, २०१५ नुसार महसूली विभागाचे वाटप करण्यात आलेले आहे.

५. सदर पदोन्नत अधिका-यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीचे/नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहित मुदतीत

नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६ मधील तरतूदीनुसार शासनस्तरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

६. आयुक्त मत्स्यव्यवसाय यांना कळविण्यात येते की, वरील पदोन्नत अधिकारी हे नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच, सदर अधिकारी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास vijay.chaudhari@gov.in या ई-मेल आयडीवर त्वरीत अवगत करावे.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२११७५०४९५००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran V Kurundkar

Digitally signed by Kiran V Kurundkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f89b7a82db2238fb7337a9a9b8e00b9c1a35b509d1f6850ddcc783bdb12090f, cn=Kiran V Kurundkar
Date: 2018.06.22 11:19:58 +05'30'

**(किरण कुरुंदकर)**
सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
४) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) महालेखापाल (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२ (मुंबई / नागपूर).
८) खाजगी सचिव, मा.मंत्री (पदुम), मंत्रालय, मुंबई.
९) खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री (पदुम)
१०) संबंधीत अधिकारी. (कार्यालय प्रमुखामार्फत)
११) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१२) निवडनस्ती पदुम-१२